**महाड, जि.रायगड येथे दिनांक २४.०८.२०२० रोजी इमारत कोसळण्याच्या दुर्घटनेमधील मृत व्यक्तींच्या वारसांना मदत देण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत .....**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : सीएलएस-२०२०/प्र.क्र.२३७/म-३**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक : ०४ सप्टेंबर, २०२०

<u>संदर्भ</u> : १) शासन निर्णय, महसुल व वन विभाग क्र. सीएलएस-२०१८/प्र.क्र.९८/म-३,दि.१९.०७.२०१८
२) विभागीय आयुक्त, कोकण यांचे पत्र क्रमांक नैसर्गिक आपत्ती/कात-६/म.इ.दु.मदत/२०२०, दि. ३१/०८/२०२०
३) जिल्हाधिकारी,रायगड यांचे पत्र क्रमांक-साशा/कार्या-१/ब-५/महाड इमारत दुर्घटना/२०२०, दि. ३१.०८.२०२०

<u>प्रस्तावना</u>:

शेतामध्ये किटकनाशक फवारणी करीत असताना होणाऱ्या विषबाधांच्या घटना, धार्मिक ठिकाणी, सार्वजनिक ठिकाणी होणाऱ्या चेंगराचेंगरीच्या घटना व मोडकळीस आलेल्या/जीर्ण झालेल्या इमारती खाली करण्याबाबत स्थानिक प्राधिकरणाने रहिवाशांना नोटीस दिलेली नाही अशा अधिकृत निवासी इमारत कोसळण्याच्या घटनांमध्ये मृत व जखमी होणाऱ्या व्यक्तींना मदत देण्याचे धोरण संदर्भाधीन क्रमांक येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहे. या धोरणानुसार महाड जि रायगड येथे दिनांक २४.८.२०२० रोजी तारिकगार्डन ही ५ मजली निवासी इमारत कोसळून झालेल्या दुर्घटनेमधील मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना व जखमी झालेल्या व्यक्तींना मदत देण्यासाठी विभागीय आयुक्त, कोकण यांनी संदर्भाधीन क्रमांक २ येथील पत्रान्वये निधी वितरीत करण्याची विनंती केली आहे. त्यानुसार निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>**शासन निर्णय:**</u>

महाड जि. रायगड येथे दिनांक २४.८.२०२० रोजी तारिकगार्डन ही ५ मजली निवासी इमारत कोसळून झालेल्या दुर्घटनेमधील १६ मृत व्यक्तींच्या कुटुंबियांना/वारसांना मदत देण्यासाठी विभागीय आयुक्त,कोकण यांना रू. ६४.०० लक्ष (रूपये चौसष्ट लाख फक्त) इतका निधी मंजूर करून सदर निधी वितरीत करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर निधी बीम्स प्रणालीवर कार्यासन म-११ यांनी विभागीय आयुक्त, कोकण यांना वितरित करावा.

२. वरील निधी खर्च करताना संदर्भाधीन क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटी, शर्ती व निकषांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे. तसेच ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर करण्यात आला आहे त्याच प्रयोजनासाठी सदर निधी खर्च करण्यात यावा.

३. मदतीची रक्कम आहरित करून मयत व्यक्तींच्या वारसांच्या बँक खात्यामध्ये हस्तातंरित करावी. सदर निधी अनावश्यकरित्या आहरित करून बँक खात्यामध्ये काढून ठेवण्यात येवू नये. या आदेशान्वये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच खर्च करण्यात यावा. <u>**लाभार्थ्यांना मदत वाटपाची कार्यवाही पुर्ण झाल्यानंतर लाभार्थ्यांची यादी व मदतीचा तपशील जिल्हयांच्या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात यावा**</u>.

४. सदर निधीतून करण्यात येत असलेल्या खर्चाचे लेखे निधी आहरित करण्यात येणाऱ्या कार्यालयाच्या स्तरावर ठेवण्यात यावे व करण्यात आलेल्या खर्चाचा कोषागार कार्यालये व महालेखापाल कार्यालयाशी त्रैमासिक ताळमेळ घेण्यात यावा. उपलब्ध करून दिलेला उपरोक्त निधी खर्ची पडल्यानंतर तातडीने निधीची उपयोगिता प्रमाणपत्रे

संबंधितांकडून प्राप्त करून घेवून एकत्रितरित्या शासनास सादर करण्याची जबाबदारी विभागीय आयुक्त यांची राहील.

५. वरील प्रयोजनासाठी होणारा खर्च मागणी क्रमांक सी-५, प्रधान लेखाशीर्ष २२३५, ०२, समाज कल्याण,१०४, वृध्द विकलांग व निराश्रीत व्यक्तींचे कल्याण (००)(०१) अपघातग्रस्तांना आर्थिक मदत (अनिवार्य), ३१, सहाय्यक अनुदाने (२२३५ ०३११) या लेखाशीर्षाखाली पुनर्विनियोजनाने उपलब्ध करून दिलेल्या तरतुदीमधुन भागविण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक : १८९/२०२०/व्यय-९, दिनांक ०३.०९.२०२० अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२००९०४११५२४५६७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Subhash Hanmant Umaranikar

Digitally signed by Subhash Hanmant Umaranikar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue and Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d5ea2bb9565eeb9b02d583f130371941a03fc5d98df65d3daafe66960a165024, serialNumber=596a24adfcfcd3edb4245812c0eaccecdf4de3ec6a308b42a682a980bca4db38, cn=Subhash Hanmant Umaranikar
Date: 2020.09.04 11:55:07 +05'30'

**( सु. ह. उमराणीकर )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,मंत्रालय,मुंबई,
२. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,मंत्रालय,मुंबई,
३. अपर मुख्य सचिव ( वित्त ), मंत्रालय,मुंबई,
४. विभागीय आयुक्त,कोकण,
५. जिल्हाधिकारी, रायगड,
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १/२, महाराष्ट्र, मुंबई/नागपूर,
७. महालेखापाल (लेखा परिक्षा) १/२,महाराष्ट्र,मुंबई/नागपूर,
८. जिल्हा कोषागार अधिकारी, रायगड,
९. मा.मंत्री ( मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
१०. मा. राज्यमंत्री (मदत व पुनर्वसन) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई,
११. वित्तिय सल्लागार व सहसचिव,मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई,
१२. कार्यासन अधिकारी (म-११), मदत व पुनर्वसन प्रभाग,मंत्रालय,मुंबई,
१३. वित्त विभाग (कार्यासन व्यय-९/अर्थ-६),मंत्रालय,मुंबई,
१४. निवड नस्ती (कार्यासन/ म-३ ).